ग्रामीण पायाभूत विकास निधी RIDF - XV अंतर्गत
नाबार्डकडून मिळणाऱ्या अर्थसहाय्यातून पाणलोट
विकास कार्यक्रमासाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

**शासन निर्णय क्र.नाबार्ड २००९/प्र.क्र. ४९ /जल ७,**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक :- २७ जानेवारी, २०१०.

**वाचा** :- शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग

१) क्र.नाबार्ड २००९/प्र.क्र. ४९/जल-७, दि.२९ ऑक्टोबर, २००९.
२) क्र.नाबार्ड २००९/प्र.क्र. ४९/जल-७, दि.१२ नोव्हेंबर, २००९.
३) क्र.नाबार्ड २००९/प्र.क्र. ४९/जल-७, दि.२० नोव्हेंबर, २००९.
४) क्र.नाबार्ड २००९/प्र.क्र. ४९/जल-७, दि.१४ डिसेंबर, २००९.
५) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांचे पत्र क्र. मृदस/RIDF/अनुदान/मृद-२/११९/२०१०, दि.१२ जानेवारी, २०१०.

**प्रस्तावना :-**

सन २००९-१० मध्ये विकसित करण्यासाठी भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे (GSDA) आणि महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर (MRSAC) यांना घोषित केलेल्या ७९३ मेगा पाणलोटांपैकी प्राधान्यक्रमानुसार प्रत्येक जिल्ह्यातून ४ असे एकूण १३२ मेगा पाणलोट RIDF अंतर्गत नाबार्डमार्फत उपलब्ध होणाऱ्या निधीतून विकसित करण्यास संदर्भाधीन दि.२९ ऑक्टोबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये तत्वतः मान्यता देण्यात आली आहे. RIDF-XV अंतर्गत नाबार्डमार्फत उपलब्ध होणाऱ्या अर्थसहाय्यातून सन २००९-१० मध्ये प्रत्येक जिल्ह्यातून २ असे एकूण ६६ मेगा पाणलोट विकसित करण्याकरीता संदर्भाधीन दि.१२ नोव्हेंबर, २००९ व दि.१४ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयांन्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. सन २००९-१० या वर्षात RIDF-XV अंतर्गत निवडलेले पाणलोट विकसित करण्याची अंमलबजावणी करण्यापूर्वी नाबार्डच्या मार्गदर्शक सूचनेनुसार प्रत्येक मेगा पाणलोटनिहाय सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तयार करणे बंधनकारक आहे. असे प्रकल्प अहवाल तयार करण्याकरीता आवश्यक

असलेले सर्वेक्षण, प्रशिक्षण, भेटी (Exposure Visit), प्रसिध्दी इ. करीता रु.३००.०० लक्ष इतका निधी संदर्भाधीन दि.२० नोव्हेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला असून उर्वरित पाणलोटांचे सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तयार करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

RIDF अंतर्गत नाबार्ड अर्थसहाय्यातून पाणलोट विकास कार्यक्रम हा प्रथमच राबविण्यात येत आहे. सन २००९-१० मध्ये निवडण्यात आलेले पाणलोट हे मेगा पाणलोट म्हणून विकसित करावयाचे असल्यामुळे त्याची व्याप्ती मोठी आहे. पाणलोट विकास कार्यक्रम कार्यान्वित करण्यापूर्वी प्रत्येक मेगा पाणलोटाचे सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) नाबार्डच्या मार्गदर्शक सूचनांनुसार तयार करुन नाबार्डकडे सादर करणे आवश्यक आहे. प्रकल्प अहवालास नाबार्डने मान्यता दिल्यानंतरच पाणलोट विकास कार्यक्रमाची प्रत्यक्ष अंमलबजावणी सुरु होणार आहे.

२. पाणलोट विकास कार्यक्रमाची प्रत्यक्ष अंमलबजावणी करण्यापूर्वी संदर्भाधीन दि.१२ नोव्हेंबर, २००९ व दि.१८ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेल्या मेगा पाणलोटांचे सर्वेक्षण, सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणे (DPR), नेट प्लॅनिंग, प्रशिक्षण, भेटी, प्रसिध्दी इत्यादी बाबींसाठी **रु.३२९.९३ लक्ष (अक्षरी रुपये तीन कोटी एकोणतीस लक्ष त्र्याण्णव हजार फक्त)** इतका निधी खालील नमूद लेखाशिर्षाखाली सन २००९-१० मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीतून मंजूर व वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**मागणी क्र.एल-७,**
**४४०२-मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च**
**१०२-मृदसंधारण, १०२ (दोन) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना.**
**१०२ (०१) (२२) मृदसंधारणाच्या उपाययोजनांद्वारे जमिनीचा विकास-**
**नाबार्ड अर्थसहाय्य (योजनांतर्गत) (दत्तमत)**
**(४४०२ २३८७), ३१ सहायक अनुदान.**

३. उपरोक्त परिच्छेद क्र.२ मध्ये नमूद केलेला निधी खर्च करण्यासाठी आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून हा निधी संबंधित क्षेत्रिय अधिकाऱ्यांना आवश्यकतेनुसार वितरण करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. प्रत्येक मेगा पाणलोटाचे सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) नाबार्डच्या मार्गदर्शक सूचनांनुसार आणि निकषांनुसार आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत किंवा नाबार्डने सुचविलेल्या अन्य संस्थांमार्फत तयार करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच प्रशिक्षण, भेटी (Exposure Visit) इत्यादि वरील खर्च नाबार्डच्या निकषांनुसार व त्यांच्या अटी व शर्तीप्रमाणे करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

५. संदर्भाधीन दि.२० नोव्हेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला **रु.३००.०० लक्ष (अक्षरी रुपये तीन कोटी फक्त)** व या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला **रु.३२९.९३ लक्ष (अक्षरी रुपये तीन कोटी एकोणतीस लक्ष त्र्याण्णव हजार फक्त)** असा एकूण **रु.६२९.९३ लक्ष (अक्षरी रुपये सहा कोटी एकोणतीस लक्ष त्र्याण्णव हजार फक्त)** इतका निधी संदर्भाधीन दि.१२ नोव्हेंबर, २००९ व दि.१८ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेल्या मेगा पाणलोटांच्या उपरोक्त परिच्छेद क्र.२ मध्ये नमूद केलेल्या कामांसाठी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. हा होणारा खर्च प्रत्येक प्रकल्पाच्या एकूण खर्चात अंतर्भूत राहील

६. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक **२०१००१२७१४३९५७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ना. श्री. कराड )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री,(जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
मुख्य सचिव यांचे सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे
महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुणे.
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
मुख्य अभियंता,लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर),पुणे
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,/सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व अधीक्षक अभियंता, पाटबंधारे,/सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे,(स्थानिक स्तर)
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दी करीता),
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व सहसंचालक,सामाजिक वनीकरण वृत्त,
सर्व मुख्य वनसंरक्षक, / सर्व उपवनसंरक्षक,
सर्व उपायुक्त (विकास),
महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेचे सर्व अशासकीय सदस्य,
महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व सहसचिव / उप सचिव/अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, जलसंधारण विभाग (खुद्द), मंत्रालय.
निवडनस्ती जल-७.